सौर कृषि पंप योजना

**कर्ज फेडीकरीता विजेवरील अतिरिक्त विक्रीकराचे (TOSE) विनियोजन.**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सौरप्र-२०१४/प्र.क्र.२१९/ऊर्जा-७**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२

दिनांक: १० जुलै, २०१५.

वाचा-

1) **शासन निर्णय क्रमांकः सौरप्र-२०१४/प्र.क्र.२१९/ऊर्जा-७, दिनांक २७ मार्च,२०१५.**
2) **अधिसूचना क्र.सौरप्र-२००१५/प्र.क्र.४८/ऊर्जा-१,दिनांक २१.४.२०१५.**

प्रस्तावना-

केंद्र शासनाने राष्ट्रीय स्तरावर सौर कृषिपंपांच्या योजनेसाठी महाराष्ट्र राज्यासाठी ७५४० नग सौर कृषिपंपांचे उद्दीष्ट निश्चित केले आहे. सदर योजनेकरीता केंद्र शासनाने ३०% अनुदान देण्याचे मान्य केले आहे. राज्य शासनाने ५% अनुदान,लाभार्थींचा हिस्सा ५% आणि उर्वरित ६०% रक्कम वित्तीय संस्था / बँकांकडून कर्जाच्या स्वरुपात घेण्यात येणार आहे. कर्जाची परतफेड करण्यासाठी विजेवरील अतिरिक्त विक्रीकराद्वारे (Additional TOSE) वरील क्र.२ येथील अधिसूचनेप्रमाणे टाटा,रिलायन्स,बेस्ट व महावितरण या कंपन्यांच्या ग्राहकांकडून प्रति युनिट १.०४ पैसे इतके वाढीव पैसे वसुल केले जातील. ही एकूण रक्कम महावितरण कंपनीस सुपूर्द केली जाईल. संदर्भ क्रमांक २ अन्वये याबाबतची अधिसूचना निर्गमित करण्यात आली आहे.

**शासन निर्णय-**

दिनांक २७ मार्च, २०१५ रोजीच्या शासन निर्णयानुसार सदर योजना राबविण्याकरीता आवश्यक असणाऱ्या निधीचे विनियोजन खालीलप्रमाणे करण्यात येईल:-

1) सदर योजनेकरीता केंद्र शासनाकडून वेळोवेळी टप्प्याटप्प्याने महाऊर्जाच्या बँक खात्यात वर्ग होणारे ३०% अनुदान महाऊर्जाने, महावितरण कंपनीकडे हस्तांतरीत करावे.
2) राज्य शासनाची ५% अनुदानाची रक्कम राज्य शासनाच्या हरित ऊर्जा निधीमधून महाऊर्जाकडे वर्ग करण्यात येईल व महाऊर्जा ही रक्कम महावितरणकडे जमा करेल.
3) लाभार्थींचा ५% हिस्सा महावितरणच्या संबंधित जिल्हास्तरीय कार्यालयामार्फत जमा करण्यात येईल.
4) नैसर्गिक आपत्तीमुळे सौर कृषिपंपाचे नुकसान झाल्यास त्यासाठी विमा उतरविण्यात येईल. विम्याच्या हप्त्याच्या रकमेचा समावेश कर्जाच्या रकमेत करण्यात येईल.

५) उर्वरित ६०% रक्कम वित्तीय संस्था / बँकांकडून कर्ज म्हणून घेण्यात येईल. लाभार्थी शेतकऱ्याच्या नांवे सदर कर्ज घेण्यात येईल व त्यास महावितरण सहअर्जदार राहिल. या कर्जाच्या परतफेडीची हमी / जबाबदारी महावितरणची राहिल.

६) सदर कर्जाची परतफेड अधिसूचना क्र. सौरप्र-२००१५/प्र.क्र.४८/ऊर्जा-१, दि.२१.४.२०१५ अन्वये विजवेरील अतिरिक्त विक्रीकराद्वारे (Additional TOSE) वाढ करुन प्राप्त निधीतून करण्यात येईल. तसेच सदर कर्जाच्या संधारणाचा(सर्व्हीसिंग) खर्चही याच निधीतून करण्यात येईल.

वीजेवरील अतिरिक्त विक्रीकराद्वारे करण्यात आलेल्या वाढीनुसार टाटा, रिलायन्स आणि महावितरण या कंपन्यांनी वसूल केलेल्या कराचा मासिक अहवाल या कंपन्या महाराष्ट्र शासनास सादर करतील व या रकमेच्या समायोजनाचे आदेश आवश्यकतेनुसार शासनस्तरावरुन निर्गमित करण्यात येतील.

महाऊर्जास या योजने अंतर्गत केंद्रीय वित्तीय सहाय्याबरोबर मिळणाऱ्या प्रशासकीय खर्चाच्या रकमेतून पुढीलप्रमाणे खर्च करण्यात येईल:-

१) या योजनेच्या प्रसिध्दीसाठी जिल्हाधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखालील स्थापन समितीस ३०%.

२) अंमलबजावणी यंत्रणा म्हणून महावितरण कंपनीस ३०%.

या योजनेकरीता ( नवीन लेखाशिर्षाचा क्रमांक येथे मुद्रित करण्यात येईल) हे नवीन लेखाशीर्ष (व्हाईट बुकमध्ये ) सुरु करण्यात येईल.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २००/१४६१, दि.१६.६.२०१५ आणि वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२८५/१५/व्यय-१६ दि.२९.६.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१०१२२२०९७८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Parkar Suryakant V

Digitally signed by Parkar Suryakant V
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy & Labour, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Parkar Suryakant V
Date: 2015.07.10 12:24:00 +05'30'

( सु.व.पारकर )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,

२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्ययांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,

३. सर्व मंत्री / सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

४. सर्व विधानमंडळ सदस्य,विधान भवन, मुंबई,
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव यांचे स्वीय सहायक,सर्व मंत्रालयीन विभाग,
१०.सर्व विभागीय आयुक्त,
११. सर्व जिल्हाधिकारी,
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा,
१३. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१५. सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई (पत्राने),
१६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सूत्रधार कंपनी मर्या.,मुंबई,
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
१८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
१९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,
२०. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा),पुणे,
२१.उप सचिव/ ऊर्जा-३, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२२. ऊर्जा उप विभागातील सर्व कार्यासने,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
२३. निवड नस्ती,ऊर्जा-७, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.